**तात्पुरती आस्थापना**

अतिरिक्त जिल्हा व सत्र न्यायाधीश अहमदपूर आणि दिवाणी न्यायाधीश (वरिष्ठ स्तर) उदगीर यांच्या न्यायालयासाठी तात्पुरती पदे निर्माण करण्याबाबत

**महाराष्ट्र शासन**

विधी व न्याय विभाग,

शासन निर्णय क्र.सीआरसी २००९/१७१/(३३/०९)/कार्या-१२.

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

**दिनांक :२८ नोव्हेंबर, २०१०.**

**पार्श्वभूमी:-** अतिरिक्त जिल्हा व सत्र न्यायालयाचे मुख्यालय उदगीर येथे तर दिवाणी न्यायाधिश वरिष्ठ स्तर यांच्या न्यायालयाचे मुख्यालय अहमदपूर येथे शासनाच्या दि. ७.२.२००१ च्या अधिसूचनेन्वये जोड न्यायालये स्थापन करण्यात आली होती. आता या जोड न्यायालयांऐवजी रेगुलर न्यायालये स्थापन करण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :**

उदगीर जिल्हा लातूर येथे दिवाणी न्यायाधिश (वरिष्ठ स्तर) तर अहमदपूर जिल्हा लातूर येथे अतिरिक्त जिल्हा व सत्र न्यायालय स्थापन करण्यासाठी खाली नमूद केलेल्या पदनामांची तात्पुरती अस्थायी पदे निर्माण करण्यास नवीन न्यायालय सुरु होईल त्या दिनांकापासून दिनांक २८.२.२०११ पर्यंतच्या कालावधीसाठी, शासन मंजूरी देण्यात येत आहे.

२. **अतिरिक्त जिल्हा व सत्र न्यायाधीश, अहमदपूर आणि दिवाणी न्यायाधिश, वरिष्ठ स्तर उदगीर यांच्या न्यायालयासाठी खालीलप्रमाणे पदे निर्माण करण्यात यावीत :-**

| अ. क्र. | पदे | अतिरिक्त जिल्हा व सत्र न्यायाधिश यांच्या न्यायालयासाठी नव्याने निर्माण करावयाची पदे | दिवाणी न्यायाधिश वरिष्ठ स्तर यांच्या न्यायालयासाठी नव्याने निर्माण करावाची पदे |
|---|---|---|---|
| १ | अति.जिल्हा व सत्र न्यायाधीश | १ | - |
| २ | अधिक्षक | १ | १ |

| | | | |
|---|---|---|---|
| ३ | सहायक अधिक्षक | - | १ |
| ४ | लघुलेखक (उ.श्रे.) | १ | - |
| ५ | वरिष्ठ लिपिक | २ | २ |
| ६ | कनिष्ठ लिपिक | २ | - |
| ७ | बेलिफ | २ | २ |
| ८ | शिपाई | २ | १ |
| ९ | सफाईगार | १ | १ |
| | **एकूण** | **१२** | **८** |

३. हा शासन निर्णय, वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.४४४/१०/व्यय-६, दिनांक २६.७.२०१० आणि अनौपचारिक संदर्भ क्र. ४९७/वि.सु.-१ दि. २६.११.२०१० अन्वये त्यांच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,**

**( शिरीष संकपाळ )**
**कार्यासन अधिकारी.**

प्रत :-

प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा), मुंबई (पत्राने),
प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, लातूर ,
अतिरिक्त जिल्हा व सत्र न्यायाधीश, उदगीर, जिल्हा लातूर
दिवाणी न्यायाधीश वरिष्ठ स्तर अहमदपूर, जिल्हा लातूर
महालेखापाल-दोन (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर,
महालेखापाल-दोन (लेखापरीक्षा), महाराष्ट्र, नागपूर,
जिल्हा कोषागार अधिकारी, लातूर ,
उप कोषागार अधिकारी, अहमदपूर आणि उदगीर,
वित्त विभाग (व्यय-६), वित्तीय सुधारणा-१, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
विधी व न्याय विभाग, का.२३ ,२४व ७
निवडनस्ती/का.१२.